# महाराष्ट्र शासन

क्र.संकीर्ण २०११/प्र.क्र.७६/जल-७.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १३ एप्रिल, २०११.

संदर्भ :- शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही २००४/प्र.क्र.१५/०४/१२, दि.२५ मे, २००६.

## कार्यालयीन आदेश

संदर्भाधीन शासन अधिसूचनेद्वारे महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ प्रसारित करण्यात आला आहे. सदर अधिनियमाच्या कलम ९ (१) व (२) अंतर्गत प्रत्येक विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख यांनी त्यांना दुय्यम अधिका-यास अंतिम निर्णय घेण्यासाठी शक्ती प्रदान करावयाच्या आहेत. तसेच विभागाशी / कार्यासनाशी संबंधित सर्व बाबींवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टीने प्रकरणे सादर करण्यासाठी अधिका-यांचे तीन स्तर निर्धारित करण्याचे निदेश देण्यात आले आहेत. त्या अनुषंगाने या कार्यासनाशी संबंधित विषयाच्या बाबतीत सोबतच्या तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे स्तर निश्चित करण्यात येत आहेत. तथापि, वरिष्ठ अधिका-यांचे निर्देश असल्यास किंवा काही विशिष्ट अपवादात्मक प्रकरणी आवश्यकता भासल्यास प्रकरणपरत्वे त्यामध्ये योग्य तो बदल करण्यात येईल.

२. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०४१३१५२८०७००१असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( ना. श्री. कराड )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

प्रधान सचिव (जलसंधारण व रोहयो) यांचे स्वीय सहाय्यक,
सचिव (ग्रामविकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहाय्यक,
ग्राम विकास व जलसंधारण विभागातील सर्व अधिकारी,
ग्राम विकास व जलसंधारण विभागातील सर्व कार्यासने,
निवडनस्ती जल-७.

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम-२००५ मधील कलम ९ (१) व (२) अंतर्गत कार्यासनाशी संबंधित बाबींवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टीने प्रकरणे सादर करण्या-या अधिका-यांचे तीन स्तर खालीलप्रमाणे निर्धारित करण्यात येत आहेत :-

| अ.क्र. | विषय | स्तर | | | आदेश / निर्णय निर्गमित करण्यास सक्षम अधिकारी |
|---|---|---|---|---|---|
| | | प्रथम | द्वितीय | तृतीय | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | **एकात्मिक पाणलोट क्षेत्र विकास कार्यक्रम -**<br>१. गतिमान पाणलोट विकास कार्यक्रम<br>२. विशेष घटक योजना<br>३. जनजाती क्षेत्रांतर्गत उपयोजना (टीएसपी)<br>४. जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना (ओटीएसपी)<br>वरील योजनेच्या धोरणात्मक बाबी, निधी मंजूरी व वितरण, विनियोजन लेखे, विधानमंडळ विषयक कामकाज (प्रश्न / ठराव / लक्षवेधी / स्थगन प्रस्ताव / कपात सूचना / आश्वासने इ.) व तद्नुषंगिक कार्यवाही. | अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव (जलसंधारण व रोहयो) | अवर सचिव / उप सचिव |
| २ | **मराठवाडा पाणलोट विकास मिशन -**<br>या योजनेच्या धोरणात्मक बाबी, निधी मंजूरी व वितरण, विनियोजन लेखे, विधानमंडळ विषयक कामकाज (प्रश्न / ठराव / लक्षवेधी / स्थगन प्रस्ताव / कपात सूचना / आश्वासने इ.) व तद्नुषंगिक कार्यवाही. | अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव (जलसंधारण व रोहयो) | अवर सचिव / उप सचिव |
| ३ | **विदर्भ पाणलोट विकास मिशन -** या योजनेच्या धोरणात्मक बाबी, निधी मंजूरी व वितरण, विनियोजन लेखे, विधानमंडळ विषयक कामकाज (प्रश्न / ठराव / लक्षवेधी / स्थगन प्रस्ताव / कपात सूचना / आश्वासने इ.) व तद्नुषंगिक कार्यवाही. | अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव (जलसंधारण व रोहयो) | अवर सचिव / उप सचिव |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ४ | **नाशिक विभाग पाणलोट विकास मिशन -** या योजनेच्या धोरणात्मक बाबी, निधी मंजूरी व वितरण, विनियोजन लेखे, विधानमंडळ विषयक कामकाज (प्रश्न / ठराव / लक्षवेधी / स्थगन प्रस्ताव / कपात सूचना / आश्वासने इ.) व तद्नुषंगिक कार्यवाही. | अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव (जलसंधारण व रोहयो) | अवर सचिव / उप सचिव |
| ५ | **कोकण विभाग पाणलोट विकास मिशन -** या योजनेच्या धोरणात्मक बाबी, निधी मंजूरी व वितरण, विनियोजन लेखे, विधानमंडळ विषयक कामकाज (प्रश्न / ठराव / लक्षवेधी / स्थगन प्रस्ताव / कपात सूचना / आश्वासने इ.) व तद्नुषंगिक कार्यवाही. | अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव (जलसंधारण व रोहयो) | अवर सचिव / उप सचिव |
| ६ | **नाबार्ड अर्थसहाय्यांतर्गत मेगा पाणलोट विकास कार्यक्रम -** या योजनेंच्या धोरणात्मक बाबी, निधी मंजूरी व वितरण, विनियोजन लेखे, विधानमंडळ विषयक कामकाज (प्रश्न / ठराव / लक्षवेधी / स्थगन प्रस्ताव / कपात सूचना / आश्वासने इ.) व तद्नुषंगिक कार्यवाही. | अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव (जलसंधारण व रोहयो) | अवर सचिव / उप सचिव |
| ७ | **आयाकट (भूविकास) विकास कार्यक्रम -** या योजनेंच्या धोरणात्मक बाबी, निधी मंजूरी व वितरण, विनियोजन लेखे, विधानमंडळ विषयक कामकाज (प्रश्न / ठराव / लक्षवेधी / स्थगन प्रस्ताव / कपात सूचना / आश्वासने इ.) व तद्नुषंगिक कार्यवाही. | अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव (जलसंधारण व रोहयो) | अवर सचिव / उप सचिव |
| ८ | कृषि विभागामार्फत राबविल्या जाणा-या मृद व जलसंधारणाच्या विविध उपचारांचे मापदंड ठरविणे. | अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव (जलसंधारण व रोहयो) | अवर सचिव / उप सचिव |